<u>नियतकालिक बदली</u>

**(सहायक कामगार आयुक्त, गट-अ)**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**

शासन आदेश क्र.बदली-०५२५/प्र.क्र.१०६/कामगार-८

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: ३० मे, २०२५.

**वाचा**:- "महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५."

**शासन आदेश**:-

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदीनुसार खाली नमूद केलेल्या कामगार आयुक्त, मुंबई यांच्या आस्थापनेवरील सहायक कामगार आयुक्त, गट-अ यांची प्रशासकीय कारणास्तव त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नांव | सध्याचे कार्यरत ठिकाण | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. प्र. भि. कावळे | मुंबई उपनगर (पश्चिम) | सहायक कामगार आयुक्त कार्यालय, चंद्रपूर |

२. सदरील आदेश तात्काळ अंमलात येत असून उपरोक्त नमूद अधिकारी यांना बदलीने पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रुजू होण्यासाठी ते धारण करत असलेल्या पदावरुन या आदेशान्वये कार्यमुक्त करण्यात येत आहे. त्यांनी त्यांच्या पदस्थापनेच्या पदावर विहित मुदतीत रुजू होणे अनिवार्य आहे.

३. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या उक्त तरतूदींनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापूर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध शासन निर्णय, क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६/ १६/ कार्यासन-१४, दि.२३.१२.२०१६ मधील तरतूदींनुसार **शिस्तभंगविषयक कारवाई** करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा **अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन" (dies non) म्हणून गणला जाईल.** याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्याना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

६. सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५३०१३१५०७३४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL YASHWANTRAO KAPADNIS

Digitally signed by SWAPNIL YASHWANTRAO KAPADNIS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=3389518a88af500ef17fd52858804c56d5b0db93ce68c9638764849614f0c8b3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=824DB7B32ED13AAC7B6F1F11E717770B52D6784F2BC41DDF0E4E9729CDB96F88, cn=SWAPNIL YASHWANTRAO KAPADNIS
Date: 2025.05.30 13:15:41 +05'30'

**(स्वप्निल कापडणीस)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

कामगार आयुक्त, कामगार भवन, ब्लॉक-ई, सी-२०, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई.

**प्रत,**

१) मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) मा.प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३) कामगार उप आयुक्त (प्रशासन) कामगार भवन, ब्लॉक-ई, सी-२०, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
४) संबंधित अधिकारी
५) महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
६) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
७) उप सचिव (कामगार-८) यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) निवडनस्ती (कामगार-८).